**श्री. इक्बाल हुसेन कासम मोमीन, पोलीस शिपाई, पोलीस आयुक्त बृहन्मुंबई, यांच्याकरीता पोलीस शिपाई संवर्गात एक अधिसंख्य पद निर्माण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-०८१८/प्र.क्र.७००/पोल-५ब,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक - २९ मार्च, २०२३.

<u>वाचा</u> :- १) पोलीस आयुक्त,बृहन्मुंबई यांचा दिनांक २७/३/२०१८ रोजीचा प्रस्ताव.
२) दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम २०१६ मधील कलम २०(४).
३) सर जे.जे.समूह रुग्णालय यांचे दिनांक ५/१/२०११ रोजीचे प्रमाणपत्र.
४) वित्त विभागाच्या उच्चस्तरीय सचिव समितीच्या दि. १३/१२/२०२२ रोजीच्या बैठकीचे दि.३०/१२/२०२२ रोजीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :**

श्री. इक्बाल हुसेन कासम मोमीन, पोशि/१०१९२ हे दि.१५/९/१९८९ पासून पोलीस दलात कार्यरत आहेत. श्री.मोमीन हे विशेष शाखा-१ येथे कार्यरत असताना अचानक त्यांना अंधुक दिसू लागल्याने त्यांनी दि.२९/५/२००५ रोजी रुग्णनिवेदन केले होते. त्यांच्या आजारावर नागपाडा पोलीस रुग्णालय येथे औषधोपचार चालू होते. पोलीस सर्जन नागपाडा पोलीस रुग्णालय यांनी दिनांक ११/५/२००६ रोजीच्या पत्रान्वये त्यांना जे.जे.समुह रुग्णालये,मुंबई येथे पुढील औषधोपचाराकरीता पाठविले. दरम्यान त्यांच्या दोन्ही डोळयांची दृष्टी गेली. जे.जे.समुह रुग्णालये, मुंबई यांच्याकडून अहवाल प्राप्त न झाल्याने तसेच श्री.मोमीन हे रुग्णनिवेदनातच असल्याने वरिष्ठ पोलीस निरिक्षक, गुन्हे अन्वेषण शाखा यांनी दि.२०/१०/२०१० रोजीच्या पत्रान्वये श्री.मोमीन यांना वैद्यकीय मंडळासमोर उपस्थित राहण्याचे आदेश दिले. जे.जे.रुग्णालय वैद्यकीय मंडळाने श्री.मोमीन यांना दिनांक १८/१२/२०१० रोजीच्या पत्रान्वये पुढील सेवेसाठी वैद्यकीयदृष्टया पूर्णपणे व कायमस्वरुपी अपात्र असल्याचा अहवाल दिला. श्री.मोमीन यांना १००% अपंगत्वाचे प्रमाणपत्र सर जे.जे.समूह रुग्णालय यांनी दिनांक ५/१/२०११ रोजी दिले आहे. पोलीस शिपाई पदाला समकक्ष पद पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई कार्यालयात उपलब्ध नसल्याने श्री.मोमीन यांचेसाठी अधिसंख्य पद निर्माण करण्यासंदर्भातील प्रस्ताव शासनास सादर करण्यात आला आहे. त्यानुसार दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम २०१६ मधील कलम २०(४) मधील तरतूदीनुसार सेवेत कार्यरत असताना दिव्यांगत्व आल्यास कर्मचा-यास त्याच्या दिव्यांगत्वानुरुप सुयोग्य पदावर पदस्थापना दिली जाईल व मूळ धारण करत असलेल्या पदाचे वेतन संरक्षण दिले जाईल. सदर पद उपलब्ध नसल्यास कर्मचा-यास दुसरे सुयोग्य पद उपलब्ध होईपर्यंत किंवा त्याच्या नियत वयोमानानुसार सेवानिवृत्तीच्या दिनांकापर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत अधिसंख्य पदनिर्माण करुन त्यावर पदस्थापना दिली जाईल. सदर तरतूद विचारात घेऊन श्री. इक्बाल हुसेन कासम मोमीन, पोलीस शिपाई यांच्याकरीता सेवासंरक्षणासहीत सर्व लाभ देण्याकरीता पोलीस शिपाई या संवर्गातील एक अधिसंख्य पद दिनांक ०५/०१/२०११ पासून ते त्यांच्या नियत वयोमानानुसार सेवानिवृत्तीच्या दिनांकापर्यंत अथवा अन्य कारणांमुळे पद रिक्त होईल यापैकी जे अगोदर घडेल त्या कालावधीसाठी निर्माण करण्यास उच्चस्तरीय सचिव समितीने मान्यता दिली आहे.

**शासन निर्णय-:**

श्री. इक्बाल हुसेन कासम मोमीन, पोशि/१०१९२,विशेष शाखा-१, यांचे एस-८ (२५,५००-८१,१००) या वेतनश्रेणीतील वेतन काढण्यासाठी पोलीस शिपाई संवर्गातील एक अधिसंख्य पद दिनांक ०५/०१/२०११ पासून निर्माण करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर अधिसंख्य पद पोलीस आयुक्त बृहन्मुंबई यांच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात येत आहे.

३. सदर पद दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम २०१६ मधील कलम २०(४) मधील तरतूदीनुसार, श्री. इक्बाल हुसेन कासम मोमीन, पोलीस शिपाई यांना सेवा संरक्षणासहित सर्व लाभ देण्याकरिता, दिनांक ५/१/२०११ पासून श्री.मोमीन यांच्या नियत वयोमानानुसार सेवानिवृत्तीच्या दिनांकापर्यंत अथवा अन्य कारणामुळे पद रिक्त होईल यापैकी जे अगोदर घडेल त्या कालावधीसाठी निर्माण करण्यात येत आहे. त्यानंतर सदर पद आपोआप संपुष्टात येईल.

४. सदर पदाच्या वेतन व भत्त्यावरील खर्च हा " मागणी क्रमांक-बी-१, मुख्यलेखाशीर्ष २०५५-पोलीस उपलेखाशिर्ष-१०८, राज्य मुख्यालय पोलीस(०२) शहर पोलीस(०२)(०१)शहर पोलीस आस्थापना २०५५००९७-०१(वेतन) " या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व सामान्य प्रशासन विभागाच्या सहमतीने तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ५२/आपुक,दिनांक २०/२/२०२३ अनुसार व उच्च स्तरीय सचिव समितीच्या दिनांक १३/१२/२०२२ रोजी संपन्न झालेल्या बैठकीतील निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२३०४०३१६०५२६६२२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

YOGITA SHRIDHAR MALAP

Digitally signed by YOGITA SHRIDHAR MALAP
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=b7742e8c5c015004bf8a11faf904d3994f1e6c348083fb8212c050bb37fc1382, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C574CC6DF7C7AE23D7188E1018C0E41F16D862FFE8E2E4B4A4B08923E9BDF7A7, cn=YOGITA SHRIDHAR MALAP
Date: 2023.04.03 16:11:23 +05'30'

**( योगिता मालप )**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१.पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
२.महालेखापाल,(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य मुंबई/ नागपूर.
३.महालेखापाल ( लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य,मुंबई/नागपूर.
४.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६.वित्त विभाग, आ.पु.क. कक्ष मंत्रालय,मुंबई.
७.सामाजिक न्याय व विशेषसहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८.निवडनस्ती, पोल ५-ब, गृह विभाग, मंत्रालय मुंबई-३२.